१५ वा वित्त आयोग-
राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी केंद्र शासनाकडून सन २०२१-२२ या आर्थिक वर्षासाठी मंजूर केलेले रु.१३६०.४६ लक्ष इतकी तरतुद सन २०२२-२३ च्या अर्थसंकल्पिय तरतुदीतुन वितरीत करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
### शासन निर्णय क्रमांकः पंविआ-५०२३/प्र.क्र.१२८/२२/आरोग्य-७

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ३० मार्च, २०२३

वाचा :-

१) भारत सरकार, वित्त मंत्रालय, नवी दिल्ली यांचे एकूण दोन मंजूरी आदेश पत्र क्र.१५(४२)/FC-XV/FCD/२०२०-२५, दिनांक २१.०२.२०२३
२) संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांचे पत्र क्र.राआसोम/१५ वि.आ./नि.वि./१५०५२४-५२९/२०२२-२३, दिनांक २२.०२.२०२३.
३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र पुरमा-३५२१/प्र.क्र.५०/२१/आरोग्य-७, दि.०४.०२.२०२२
४) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र बीयुडी-१३२२/प्र.क्र.६०/२२/आरोग्य-७, दि.०५.०१.२०२३

प्रस्तावना:-

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी विविध बाबीकरीता राज्यास सन २०२१-२२ या वर्षाकरीता एकूण रु.१३३०८१.०० लक्ष इतके अनुदान मंजूर केले आहे. त्यापैकी संदर्भ क्र.३ व ४ येथील दिनांक ०४.०२.२०२२ व दि.०५.०१.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकूण रु.७७८००.६९ लक्ष व रु.३०५.४५ लक्ष असे एकूण रु.७८१०६.१४ लक्ष इतके अनुदान राज्यास वितरीत केले आहे. तसेच आता उर्वरीत रु.५३२७३.८४ लक्ष अनुदाना पैकी रु.१३६०.४६ लक्ष इतके अनुदान केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेले आहे. सदर अनुदान सन २०२२-२३ च्या मंजूर तरतुदीतून वितरीत करण्यास मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासनाने १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीच्या अनुषंगाने राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी विविध बाबीकरीता उपलब्ध करुन दिलेले रु.७८१०६.१४ लक्ष इतके अनुदान संदर्भ क्र.३ व ४ येथील शासन निर्णयान्वये वितरीत केले आहे. तसेच आता उर्वरीत रु..५३२७३.८४ लक्ष अनुदाना पैकी रु.१३६०.४६ लक्ष इतके अनुदान खालील विवरणपत्रात लेखाशिर्ष निहाय नमूद केल्यानूसार वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

(रु.लाखात)

| अ.क्र | लेखाशीर्ष | सन २०२२-२३ अर्थसंकल्पिय तरतूद | निधी वितरणाची रक्कम |
|---|---|---|---|
| १ | मागणी क्र. आर-१<br>२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य<br>०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषमचिकित्सा<br>११० - रुग्णालये व दवाखाने<br>(०२) १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार सहायक अनुदाने<br>(०२) (०४) ग्रामीण उप आरोग्य केंद्राचे आरोग्य वर्धीनी केंद्रामध्ये रुपांतर करणे (ग्रामीण) १५ वा वित्त आयोग **(अनिवार्य) १००% केंद्र हिस्सा**<br>**(२२१०H२०२)** ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | १९१९५.०० | ४०९.१२ |
| २ | मागणी क्र. आर-१<br>२२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य<br>०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषमचिकित्सा<br>११० - रुग्णालये व दवाखाने<br>(०२) १५ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार सहायक अनुदाने<br>(०२) (०२) गटस्तरीय सार्वजनिक आरोग्य युनिट (ग्रामीण ) १५ वा वित्त आयोग **(अनिवार्य) १००% केंद्र हिस्सा**<br>**(२२१०H१७८)** ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेतर) | ७०८३.०० | ९५१.३४ |
| | **एकूण** | **२६२७८.००** | **१३६०.४६** |

०२. केंद्र शासनाने संदर्भ क्र.१ अन्वये दिलेल्या मार्गदर्शक सूचनाप्रमाणे राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी विविध बाबीकरीता मंजूर केलेल्या आराखडयानुसार राज्यास उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाचा विनियोग करण्यात यावा. तसेच सदर निधीचा विनियोग झाल्यानंतर त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation Certificate) विहित नमुन्यात केंद्र शासनास सादर करण्यात यावे.

०३. सदरच्या निधीचा विनियोग हा राज्यातील आरोग्य व्यवस्था बळकट करण्यासाठी नागरी व ग्रामीण घटकांतर्गत करावयाचा असल्याने त्याकरीता राज्य आरोग्य सोसायटी, जिल्हा आरोग्य सोसायटी व नगरविकास विभागाच्या अंतर्गत विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्था आणि ग्रामविकास

व पंचायत राज विभागाच्या अंतर्गत ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्था यांच्याशी समन्वय साधून करण्यात यावा.

०४. उपरोक्त अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना आहरण व संनियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबींवर  खर्च करण्यासाठी सदर रक्कम आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, राज्य आरोग्य सोसायटी यांच्याकडे सूपुर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा, मुंबई यांना “नियंत्रण अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

०५. तसेच सदर निधीच्या विनियोगाबाबत व त्यावरील संनियंत्रण व प्रगती अहवालाच्या अनुषंगाने केंद्र शासनाच्या संदर्भ क्र.१ मधील पत्रान्वये दिलेल्या निर्देशाचे पालन करणे बंधनकारक राहील.

०६. वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रका सोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटी व शर्तीची पूर्तता केली असल्याचे कार्यक्रम प्रमुख / संचालक (वित्त व लेखा), राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांनी शासनास कळविले असून त्याबाबतचे प्रमाणपत्र सादर केले आहे.  त्यामुळे सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन परिपत्रकाच्या परिशिष्ठातील मुद्दा क्र. १ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र शासन वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक मुंविनि-२०२२/प्र.क्र.२७/२०२२/ विनियम, दिनांक १२.०१.२०२३ मधील नमूद अटी व शर्तींच्या अधिन राहून निधी वितरीत करण्यात येत आहे.

०७. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने राज्य आरोग्य सोसायटीच्या लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप घेतलेले नाहीत.

०८. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

०९. सदर प्रस्तावात वस्तू खरेदी प्रस्ताव तसेच, भांडवली वस्तू खरेदीचा समावेश नाही. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.  शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक ४ एप्रिल, २०२२ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तींचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

१०. सदर अनुदान सशर्त असून यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाचे प्रमाणपत्र सादर केले आहे. वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

११. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी राज्य आरोग्य सोसायटीच्या स्वतंत्र बँक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक २४.०६.२०२१ व १४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे/ अटी व शर्तीचे पालन करुन त्यासंदर्भात आवश्यक ते प्रमाणपत्र सादर करणे अथवा आवश्यक त्या बाबी स्वतंत्रपणे प्रमाणित करणे राज्य आरोग्य सोसायटीस अथवा सदरहू निधी ज्या यंत्रणेमार्फत खर्च करण्यात येणार त्या कार्यक्रम प्रमुखास बंधनकारक राहील.

१२. सदरचा निधी खर्च करतेवेळी आवश्यक तेथे शासन निर्णय, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, दिनांक ०१.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार करावयाच्या खरेदीबाबत प्रशासकीय मान्यता घेण्यात यावी.

१३. सदरचा खर्च वर तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे संबंधित लेखाशीर्षाखालील सन २०२२-२३ च्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा व त्या लेखाशीर्षाखाली खर्ची दाखविण्यात यावा.

१४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१४४/व्यय-१३, दिनांक १५.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२११८१६१५१८१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA VITTHAL KUDALE

Digitally signed by RAJENDRA VITTHAL KUDALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=b512f7ff8b758d60a4598c24a36386a4805881cbcea84410a43526338ca5896f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=92FCD41179A2BA99BFFA75CBE0C90685A327C8ACC0593DB3D1CCAD3F24BA6315, cn=RAJENDRA VITTHAL KUDALE
Date: 2023.03.30 14:25:40 +05'30'

**( राजेंद्र वि. कुडले )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र- १, मुंबई/ महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अति. संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पूणे

६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, पुणे
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
९. वित्त विभाग ( अर्थसंकल्प/व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०. कार्यासन अर्थसंकल्प/लेखा, सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
११. निवडनस्ती ( आरोग्य -७) .